जळगांव जिल्ह्यातील यावल तालुक्यातील ४ इतर जिल्हा मार्ग रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.११/नियोजन-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक- ०३ ऑक्टोबर, २०१८**

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र. का-५/ साबांप्रविना/ प्रआ/ रस्ते दर्जोन्नत/ ता. यावल/ ३२७२/ २०१८, दि.२९/०६/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भाधिन पत्रांन्वये जळगांव जिल्ह्यातील रावेर तालुक्यातील ४ रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे.

सदर ४ रस्त्याने रावेर व यावल तालुक्यातील ६ गावे व ३१९६५ लोकसंख्या जोडली जातात. सदर रस्ते बाजारपेठ, औद्योगिक क्षेत्र, शेतमालाची वाहतूक, शालेय विद्यार्थ्यांसाठी, नागरिकांना सांस्कृतिक देवाण घेवाण च्या दृष्टीने सोयीचे असल्याने प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचा प्रस्ताव विचारात घेऊन यावल तालुक्यातील रावेर मतदार संघातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | समाविष्ठ रस्त्यांचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | मारूळ हंबर्डी भालोद पिळोद ते राज्यमार्ग- ४३ रस्ता. | इतर जिल्हा मार्ग-११ | (०/०० ते २५/००) २५.०० कि.मी. | २५.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-७५ |
| | डोंगरदे डोंगर कठोरा बोरखेडा खु. | इतर | (०/००ते ५/००) | ३५.०० | प्रमुख जिल्हा |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २. | हिंगोणा बामणोद वनोली कोसगाव दुसखेडा रस्ता. | जिल्हा मार्ग-९० | ५.०० कि.मी. | कि.मी. | मार्ग-७६ |
| | | इतर जिल्हा मार्ग-०८ | (०/०० ते ३०/००) ३०.०० कि.मी. | | |
| ३. | फैजपुर पिंपरूड वढोरा करंजी रीधुरी दुसखेडाता रस्ता. | इतर जिल्हा मार्ग -१३ | (०/००ते १८/००) १८.०० कि.मी. | १८.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-७७ |
| | **एकूण** | | | **७८.०० कि.मी.** | |

उपरोक्त रस्त्यांपैकी अनुक्रम-२ या रस्त्यावरील डोंगर कठोरा - बोरखेडा खु. § हिंगोणा (साखळी क्र. ५/०० ते १५/००) या १०.०० कि.मी. लांबीवर मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेमध्ये काम मंजूर आहे. सदर १०.०० कि.मी लांबीवर "मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेचा कालावधी संपल्यानंतरच सार्वजनिक बांधकाम विभागाकडून कामे करण्यात येतील." या अटीच्या अधीन राहून सदर रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहे.

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील जळगांव जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **७८.००** कि.मी. ने वाढ होवून एकूण लांबी (२६६९.७०० + ७८.००) म्हणजेच **२७४७.७०० कि.मी.** इतकी व **इतर जिल्हा मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **७८.००** कि.मी. ने घट होवून एकूण लांबी (१७८५.१०० - ७८.००) म्हणजेच **१७०७.१०० कि. मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००३१५३५२२५११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: CN = Prashant Vinayakrao Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Works Department
Date: 2018.10.03 15:40:36 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी,जळगांव.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद जळगांव.

५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, जळगांव (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जळगांव.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

९) निवडनस्ती.